# क्रमांक:३
# महाराष्ट्र दिन

महाराष्ट्रांतील पहिला दिन— 'ज्ञानेश्वरी प्रकट दिन' दुसरा— 'शिवराज्याभिषेक दिन' आणि तिसरा— 'महाराष्ट्र दिन' हा आहे.

संयुक्त महाराष्ट्रासाठीं ज्यांनी तुरूंगवास भोगला, हालअपेष्टा सोसल्या, जे हुतात्मा झाले, त्यांना हा महाराष्ट्र कधींतरी विसरणे शक्य आहे कां?

पूर्वी मुंबई इलाखा होता.(Bombay province ). त्यावेळीं 'मुंबई मराठ्यांची' असे नुसते म्हणायचे. तिच्यावर खरा हक्क गुजराथी सांगत होते. ती गुजराथला जोडावी म्हणून ते आकाश-पाताळ एक करीत होते.

मुंबई इलाख्यांतील मराठी भाषिक पराकाष्ठेची जिद्द ठेऊन प्राणपणानें लढले. शिवछत्रपतीप्रमाणें त्यांना स्वकीय म्हणजे राज्यशासन आणि परकीय म्हणजे दिल्लींतील मध्यवर्ती सत्ता या शत्रूंशीं सतत पांच वर्षें चिवटपणानें झुंज द्यावी लागली.

या राज्याला प्राचीन परंपरेशीं निगडित असे स्वत:चें नांव नव्हतें. स्वत:ची ओळख **(Identity)** नव्हती. गोपराष्ट्र, नलराष्ट्र, पाण्डुराष्ट्र, अपरान्त, विदर्भ आणि अश्मक मिळून महाराष्ट्र होतो याची जाणीव नव्हती. महाकान्तारापासून महाराष्ट्र हा शब्द रूढ झाला होता, हें ध्यानीं घ्यावें. या महाराष्ट्राला इसवी सन पूर्व १ हजार वर्षांची प्राचीन परंपरा आहे.

'महाराष्ट्र दिन' या दिवशीं, आचार्य प्रल्हाद केशव अत्रे यांची न चुकतां आठवण होते. संयुक्त महाराष्ट्र निर्मितींत त्यांचा सिंव्हाचा वाटा होता. या चळवळीची सगळी धुरा त्यांनीच वाहिली होती. या लढ्याला एक समर्थ नेतृत्त्व

मिळाले होते, ही गोष्ट त्यांच्या कट्टर शत्रूंनीहि मान्य केली होती.

ज्ञानदेवांची स्फूर्ति आणि शिवछत्रपतींची दीप्ती या महाराष्ट्रांत अमर, अखंड आहे. तीच स्फूर्ति व दीप्ती महाराष्ट्राने अत्रे यांच्यारूपानें पुन्हा अनुभविली. आपल्या छातीचा बांध घालून पावनखिंड लढविणारा बाजीप्रभू किंवा पुरंदरसाठीं प्रलयंकारी संग्राम करणारा मुरारबाजी या नररत्नांची आठवण करून देणारी आचार्य अत्रे यांची ती धिप्पाड मूर्ति समोर उभी ठाकते.

आचार्य अत्रे यांचे लेख आणि भाषणें म्हणजे 'जिवंत आग' होती. ''अंजन कांजन करवंदीच्या काटेरी देशा'' अशी त्यांची भाषा शत्रुपक्षाला नखाग्रांनी रक्तबंबाळ करणारी होती. सतत ५ वर्षें तन-मन-धनानें झुंज देऊन त्यांनी महाराष्ट्र-शत्रूंच्या अब्रूची लक्तरें याच महाराष्ट्राच्या वेशीवर टांगलीं. त्यांचे असे धिंडवडे काढले कीं, लोकांना आपले तोंड दाखविण्याची त्यांना सोय राहिली नाही.

यांत नेहरूसहित काँग्रेसची सगळी बडी बडी धेंडे होती. यांचा झालेला तमाशा सगळ्या भारताने पाहिला. यांत नेहरूंनी स्वतःची किंमत घालविली. भारतांतील अनेक राज्यापैकी महाराष्ट्र एक राज्य. त्याचे प्रश्न सोडवणें बाजूलाच राहिले मात्र नेहरूंनी तेथे हीन दर्जाचें राजकारण करून लोकांचे शिव्याशाप खाल्लें. हें पहा अखिल भारतीय नेतृत्व! शिवाजी काय एक वाट चुकलेला देशभक्त होता. { ही शिवछत्रपतीविषयीं नेहरूंची एकेकाळची मुक्ताफळें आहेत.}

गुलामगिरींतून मुक्त झालेल्या या स्वातंत्र्याच्या काळांत आपल्याच लोकांनी गलिच्छ राजकारण खेळून नरसंहारापर्यन्त हीन पातळी गाठावी! असे असेल तर ब्रिटीशसत्ता काय वाईट होती? तिला कशासाठीं वाईट म्हणायचे? काँग्रेसवाल्यांनी स्वतंत्र भारताच्या तोंडाला काळं फासलं!!!

काय असेल ते असो; मध्यवर्ती सत्तेने महाराष्ट्राविषयीं नेहमी दुजाभाव धरला आहे. त्याचा दुस्वास केला आहे. आणि शिवकालापासून हें असें अव्याहत चालूं आहें. त्यामुळें महाराष्ट्राला दरवेळीं आपलें अस्तित्व झगडून भांडून सिद्ध करावे लागले आहे. मध्यवर्ती सत्ता महाराष्ट्राची पोकळ स्तुती करेल पण कधीहि या सत्तेने महाराष्ट्राच्या पाठीवरून मायेचा हात फिरविला नाही. आजच्या एवढ्या सुशिक्षित आणि विद्यासंपन्न काळांतहि स्थिती अगदी जशीच्या तशीच आहे याचे नवल वाटते. शिवकालखंडापासून महाराष्ट्राचे आंतले आणि बाहेरचे हितशत्रू त्यावेळीं जसे होते तसेच, याहिवेळीं, याहिपरिस्थितींत असल्याचे अगदी स्पष्टपणें निदर्शनास आलें. यासाठीं आचार्य अत्रे यांचा ‘कऱ्हेचें पाणी’ या आत्मचरित्राचा ५ वा खंड पहा. महाराष्ट्र त्याच्या अंतर्बाह्य शत्रूंनी सदैव सर्वकाळीं पोखरलेला आहे आणि दरवेळीं महाराष्ट्राला त्यासाठीं प्राणांतिक लढत द्यावी लागली आहे.

मात्र संयुक्त महाराष्ट्राचा मंगल कलश आणण्यासाठीं हेच घरभेदे सूर्याजी पिसाळ लगालगा पुढे आले आणि त्याचें श्रेय आपल्या पदरांत पाडून घेण्यासाठीं धडपडले.

पुण्यस्य फलमिच्छन्ति पुण्यनेच्छन्ति मानवः। या लोकांना पुण्याचें फळ हवे असते पण पुण्य नको असते. मध्यवर्ती सत्तेचे लाचार आणि कोडगे झालेलें हे समाज कंटक, यांना पुण्य म्हणजे काय आणि ते कशाशी खातात याचा तरी पत्ता आहे काय? पैशाला, सत्तेला आणि चैनबाजीला चटावलेलें हे नराधम आहेत कारण यांनी माणुकीला काळिमा आणणारी निर्घृण कृत्यें केली. दंगल उसळली तर पोलीस शक्यतों हवेंत गोळीबार करतात. आणि तेवढ्याने दंगल आटोक्यांत न आली तर प्रत्यक्ष गोळीबार केल्यावर एखाद दुसरा ठार झाल्याचें निदर्शनास येतें. संयुक्त महाराष्ट्राच्या त्या चळवळीच्या काळांत याच हरामखोरांनी सरळ गोळिबाराच्या ऑर्डर्स दिल्या. त्यांत शंभरापेक्षांहि जास्त सत्याग्रही ठार झाले.

यांतील शिवतीर्थावर मृत झालेल्यांची संख्या सर्वांत जास्त आहे. यावेळीं बेछूट झालेल्या गोळ्यांच्या या वर्षावांत लहान मुलेंहि सुटली नाहीत. डोक्याला गोळ्या लागून कांहींचे अक्षरशः मेंदू बाहेर आले. इतके भयानक हत्त्याकांड झालें. लोकमान्य टिळक म्हणाले होते, 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे.' मात्र या स्वराज्यांत मोरारजी आणि नेहरू या हरामखोर गांधीवाद्यांनी महाराष्ट्रांत दुसरें जालियनबाग हत्त्याकांड केले. नंतर या गोळीबाराची चौकशी? नांव सुद्धां काढूं नका. स्वतंत्र भारतांतील हे पक्षश्रेष्ठी, महाराष्ट्राच्या दंडकारण्यांतील हे राक्षस, यांना दिल्लीच्या लंकेतील रावणाचा उघडपणें पाठिंबा होता. हे सगळे औरंगजेबाची औरस संतान असलेले नराधम आहेत.

यानंतर खरी ठिणगी पडली. अत्र्यांनी रणशिंग फुंकलें. मराठी भाषिक आणि राज्यकर्ते यांच्यांत भयानक झगडा सुरूं झाला. कांहीं खडे व गडंग वगळतां झाडून सर्व पक्ष आणि

सर्व मराठी भाषिक एकत्र आले. राजकारणांत एकमेकांचे हाडवैरी असलेलें, कम्युनिस्ट, समाजवादी, राष्ट्रदल, हिंदुत्त्ववादी इत्यादि सर्व पक्ष आपापले मतभेद विसरून मराठी भाषेच्या झेंड्याखालीं खांद्याला खांदा लावून एकत्र उभे राहिले. एक भली मोठी फळी निर्माण झाली. तिनें अखिल महाराष्ट्र ढवळून काढला. मरगळलेलें, आळसांत लोळणारे गयावळ हि खडबडून जागे झाले. आणि सर्वांनी एकच कल्लोळ उठवला. जिंकूं किंवा मरूं अशा निर्धारानें लक्षावधी बाहू आपल्या मुठी आवळून या स्वातंत्र्य-संग्रामाला सज्ज झाले. महाराष्ट्राचें हें ऐक्य हें तेज भारतवर्षाच्या आणि जगाच्या पुन्हा एकदां प्रत्ययास आले. स्वातंत्र्यावर आघात होताक्षणीं महाराष्ट्र कसा उग्र व दीप्तीमान होतो याचा प्रत्यय दिल्लीश्वराच्या सिव्हासनाला पुन्हा एकदां आला आणि मराठा मोडेल पण वाकणार नाहीं याची त्याला खात्री पटली.

शिवछत्रपतींनी त्यांच्या काळांत स्वकीय आणि परकीय अशा शत्रूंच्या पाशांतून महाराष्ट्र भूमि मुक्त केली. अगदी तेंच कार्य आचार्य अत्रे यांनी एका वेगळ्याच स्वरूपांत केलें. केवढा झगडा! हजारोंच्या संख्येने सत्त्याग्रहींनी तुरूंगवास स्वीकारला. जेलमध्यें जागा पुरेनाशी झाली, एवढे सत्त्याग्रही येत राहिले. शेवटी सत्त्याग्रही कैद्यांच्या पथाऱ्या तुरूंगांतील मोकळ्या जागेंत आल्या. मुंबईसह महाराष्ट्राच्या जिल्ह्यांतून आणि असंख्य तालुक्यांतून अगणित मोर्चे निघू लागले.शहरांशहरांतून आणि गावांगावांतून भाषणें आणि व्याख्यानांना जणूं उधाण आले. अत्र्यांच्या ‘मराठा’ व ‘नवयुग’ यांच्या गगनभेदी गर्जनेनें महाराष्ट्रांतील शहरें आणि खेडीपाडीहि दणाणून सोडली. ‘मराठा’ प्रचंड प्रमाणांत खपूं लागला. सकाळ झाली कीं, लोक ‘मराठा’ ची प्रतीक्षा करूं लागले. लोक दुसरी वर्तमानपत्रें वाचेनासे झाले. सकाळ, लोकसत्ता कॉंग्रेसच्या ताटाखालची मांजरं होती. ‘मराठी बाण्याचें एकमेव मुखपत्र’ अशी ‘मराठा’ ची कीर्ती दिगंत पसरली.

या मराठी भाषिकांच्या लढ्यांत कवि, साहित्यिक, शाहीर, गोंधळी, वासुदेव, भराडी, इतकेच नव्हें तर तमासगीरहि यांत सामील झाले. हे सगळे महाराष्ट्राची गौरवगीतें गाऊं लागले आणि संयुक्त महाराष्ट्रासाठीं चाललेल्या या लढ्याचें महत्व आपापल्या परीने लोकांना सांगूं लागले. शाहीर डफावर थाप मारून म्हणूं लागले,

‘अहो, मराठे गडी तुम्ही का हो निजला । काय मेल्या आईचं दुध प्याला? वासुदेव सकाळच्या प्रहरांत मराठी माणसांना जागवूं लागले तर गोंधळी रात्रीला गोंधळ घालून सगळ्या देवांना आवाहन करूं लागले कीं, आमचें हें आंदोलन यशस्वी करण्यासाठीं तुम्ही सगळे मदतीला धावून या. असा अवघा महाराष्ट्र पेटून उठला. असे हें जन-आंदोलनाचें तेजस्वी पर्व पाहून कॉँग्रेसवाल्यांतील अनेकांचें नेत्र पाणावलें. सुरवातीला या आंदोलनाला

विरोध करणाऱ्या स.का. पाटलांनी नंतर त्यांतून अंग काढून घेतलें.

राजधानी दिल्लीवर मराठी भाषिकांचे प्रचंड मोर्चे गेले. खुद्द राजधानींत नेहरूंनी स्वतःची किंमत घालविली. तब्बल ५ वर्षें हा संग्राम चालूं होता. १९५७ च्या सार्वत्रिक निवडणुकींत संयुक्त महाराष्ट्र समितीने अभूतपूर्व विजय मिळविला. खुद्द आचार्य अत्रे गिरगांव मतदार संघातून बहुमतानें निवडून आले. त्यानंतर मुंबई महापालिकेच्या निवडणुकाहि समितीनें जिंकल्या. १९ नोव्हेंबरला एक मैल लांबीचा दुसरा मोर्चा दिल्लीच्या रस्त्यावरून गर्जना करीत लोकसभेच्या दारापयर्यन्त पोहोचला.

संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनाचें वाढते उग्र स्वरूप पाहून अखेर कॉंग्रेस सरकारने द्विभाषिक राज्य मोडून गुजराथ व महाराष्ट्र ही दोन स्वतंत्र राज्यें करण्याचा आणि मुंबई महाराष्ट्राला देण्याचा निर्णय जाहीर केला. अखेर नेहरूंनी हार मानून दिल्लीमध्यें मुंबईसह संयुक्त

महाराष्ट्राची अधिकृत घोषणा केली. त्यानुसार अखेर १ मे १९६० ला 'महाराष्ट्र' या नांवाने स्वतंत्र मराठी राज्य निर्माण झाले.

महाराष्ट्रांत आनंदकल्लोळ झाला. एतद्देशीय म्हणजे राज्यशासन आणि परकीय म्हणजे मध्यवर्ती सत्ता या राहू-केतूंच्या ग्रहणांतून हा महाराष्ट्र मुक्त झाला आणि आपल्या पूर्ण तेजानें पुन्हा तळपूं लागला. आतां मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती झाली. केवढा भाग्याचा दिवस तो ! मराठी मनाला नव-संजीवनी देणारी केवढी अपूर्व घटना घडली ! मराठी मनें पुन्हा एकदां फुलली. आमचें खरे स्वरूप आम्हांस प्राप्त झाले. आम्ही शिवछत्रपतींचे वारस आहोत याचें भान आले.

मात्र दिल्लीवाल्यांचें पूर्वीपासून मत आहे कीं, महाराष्ट्र भांडखोर आणि रांगडा आहे. म्हणजे काय कीं, ''उसको रहनसहनकी और बाते करनेकी तमीज नहीं है।'' हे हरामखोर आम्हास कसे वागावें याची अक्कल शिकवितात.

'सातसौ चूहे खाके बिल्ली चली हजको।' आणि ती दुसऱ्यास उपदेश करते आहे. तसाच हा प्रकार आहे.

महाराष्ट्र रांगडा आहे. कबूल. त्याच्या वागण्याला इस्त्री नाही. तो रांगडा आहे पण त्याचें अंतःकरण सरळ आहे, त्यांत वक्रता नाही कारण त्याच्यापाशीं कोडगेपणा नाही. लाचारी नाही. ''राकट देशा, कणखर देशा, दगडांच्या देशा''असा हा महाराष्ट्र आहे. त्याला वैभवाची, चैनबाजीची, ऐश-आरामाची मुळी-सुद्धा अभिलाषा नाही. त्याला हवे तें स्वातंत्र्य! स्वातंत्र्याचा दुर्दम्य अभिनिवेश असणारा आणि त्यासाठीं प्राणपणानें लढणारा असा हा देश आहे.

या महाराष्ट्राला इसवी सन पूर्व १ हजार वर्षांची प्राचीन परंपरा आहे. या परंपरेनुसार आम्ही आमचें जीवन बदलणार आहोत. म्हणजे त्यांत परिवर्तन करणार आहोत. फार प्राचीन काळांत नव्हें तर अगदी नजीकच्या साडेतीनशें

वर्षांपूर्वीच्या शिवकालखण्डांत हा देश स्वतंत्र होताच ना! त्यावेळीं कुठे इसवी सन होता? आतां असा कोणता मूलोत्पाटी बदल झाला कीं, इंग्रजाच्या १५०वर्षांच्या गुलामगिरीचें प्रतीक असणाऱ्या इसवी सनामध्यें आम्ही गुंतून रहावे? आम्ही आमच्या या महाराष्ट्र भूमीची अस्मिता सांभाळली नाही तर आमचें अस्तित्वच शिल्लक रहाणार नाही. सर्वांगांनी ही अस्मिता सांभाळणें हा आमचा स्वधर्म आहे आणि तो अपरिहार्य आहे. म्हणजे टाळतां न येणारा असा आहे. “ ‘स्व’लाच टाळणें तें होते निजधर्म टाळण्यांमाजीं। त्याच्याच आश्रयानें प्रगती स्थिती साध्य इष्ट आम्हां जी।।.”

प्रथमचा ‘महाराष्ट्र दिन’ कोणता? १मे १९६० मुळीच नाही. आम्ही तो विसरून गेलो आहोत. या दिवशीं मुंबईत पोलीस संचलन केले जाते. बाकी कांहीं नाही. आजहि मुंबई इलाख्याच्या काँग्रेस सरकारचें मानस दिल्लीच्या गुलामीच्या विचारावर पोसले जात आहें हें पाहून नवल वाटतें. यांना महाराष्ट्राची चाड

नाहीं म्हणून मी मुंबई इलाखा मुद्दाम म्हणालो. कॉँग्रेसचे, ‘कॉँग्रेस गवतासारखे’ या भारतांत घाणेरडे पीक आहे.

आमच्या महाराष्ट्र पंचांग दिनदर्शिकेंतील प्रथमचा महाराष्ट्र दिन असा—

वैशाख मासे उत्तरायणे पंचम्यां तिथौ रविवासरे आर्द्रा दिवस नक्षत्रे शालिवाहन शके १८८२ एवंगुण विशेषेण विशिष्ठायां शुभपुण्यतिथौ श्री शिवछत्रपती स्मरणेन संयुक्त महाराष्ट्र राज्य-संस्थापना दिनोत्सवस्य शुभारंभं करिष्ये इति। यावेळीं शिवशक २८७ होता.

१ मे १९६० चें त्यावेळेचें पंचांग पाहून मी हा तिथी-निश्चय केला आहे.

आम्ही ३ दिवस हा दिनोत्सव साजरा करतो.

वैशाख शुद्ध तृतीया—अक्षय्य तृतीया— हा पहिला दिवस. वैशाख शुद्ध चतुर्थी—हा दुसरा दिवस. आणि

## वैशाख शुद्ध पंचमी

# महाराष्ट्र दिन

## हा मुख्य दिनोत्सव

या वर्षी म्हणजे शके १९२५ ला ४४ वा दिनोत्सव होऊन गेला आहे. पुढील वर्षी म्हणजे शके १९२६ मध्यें वैशाख शुद्ध पंचमीस ४५वा दिनोत्सव आहे.

# महाराष्ट्र दिन वैशाख शु०५

# शिवराज्याभिषेक-दिन

# ज्येष्ठ शु०१३ त्रयोदशी

या वर्षी शिवशक ३३० आहे. शके १९२६ ला ३३१ येतो.

संयुक्त महाराष्ट्र दिन —तीन दिवसांच्या उत्सवाचा जो कार्यक्रम आहे, त्याचा तपशील दिनदर्शिकेच्या एका लेखांत मी तो संपूर्णपणें दिला आहे.

संयुक्त महाराष्ट्राच्या या प्रथम दिनानें मराठी माणूस व मराठी मन यांना सुप्रतिष्ठित केले. आमच्या लेखीं या दिवसाचें मोल फार फार मोठे आहे. या दिवशीं ज्ञानदेव आणि शिवछत्रपतीच्या या महाराष्ट्राला विलक्षण संजीवनी प्राप्त झाली. काव्य, साहित्य आदि मराठी क्षेत्रे पुन्हा ढवळून निघाली. महाराष्ट्र गाथेला आणि महाराष्ट्र गीतांना पुन्हा एकदां बहर आला.

बहु असोत सुंदर संपन्न की महा।
प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा।।

आप्पा ठोंबरे
मार्गशीर्ष अमावस्या शके १९२५
दिनांक : २२/१२/२००३

महाराष्ट्राच्या इतिहासांतील संयुक्त महाराष्ट्र आंदोलनाचा काळ हें एक तेजस्वी पर्व होतें. महाराष्ट्राच्या अभिमानानें प्रत्येक मराठी माणूस त्या काळांत पेटून उठला होता.'मुंबईसह संयुक्त महाराष्ट झालाच पाहिजे,' ही एकच गर्जना साऱ्या मराठी मुलखांत दणाणत होती. या लढयाची तुलना शिवकालीन स्वराज्याच्या अभिमानाच्या भावनेशीच केवळ करता येईल. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची स्थापना होऊन आज ४५ वर्षे होऊन गेली आहेत. त्याआधी ५ वर्षे संयुक्त महाराष्ट्र स्थापनेच्या मागणीचा लढा महाराष्ट्रांत चालूं होता.

आजच्या तरूण पिढीला या लढ्याची प्रखरता माहीतहि नसेल. आजच्या महाराष्ट्रांत संयुक्त महाराष्ट्र लढ्याची आठवण पुनःपुन्हा जागवली पाहिजे, तरच सारा मराठी माणूस या लढ्यांत कसा एक झाला होता, एकमुखानें गर्जना करीत होता आणि एकाच भावनेनें रात्रंदिवस तळमळत होता, याची जाणीव आजच्या तरूण पिढीला होईल.

शके १९२७ इ.सन २००५

# महाराष्ट्र–भूपाळी

प्रभावशाली परम मंगला महाराष्ट्र देशा ।
तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा ।। धृ०

सह्याद्रीच्या सहस्र शिखरीं उन्नत झालेला
गोदा, कृष्णा, भीमा यांनी पुनीत केलेला
पश्चिम सिंधू बंधु पाठिशीं पूर्वोदधि जामात
विंध्याद्रीची उंची लक्षी सातपुडा प्रांत
अलंकार जयाचे पैठण, पंढरपुर
आळंदी, चाफळ, देहू, तुळजापुर
की पुणे, रायगड, शिवनेरी, सुंदर
रजःकणाला लावुनी भालीं महाराष्ट्र देशा
तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा ।। १ ।।

वरी, नाचणी, भात पिकवितो कोकणचा प्रांत
गहू, बाजरी, कापुस, शाळु देशावर होत
कांबळ खांदी, वहाण पायीं, डोइस मुंडासे
शामलवर्णी सानरूप तव सोज्वळ मज भासे

ते विळे कोयते शस्त्रें ही हातिची
ती बटे ठेंगणी भीमेच्या काठिची
मिळविती धुळीला कीर्ति बादशाहिची
वीरांना त्या वंदन आमुचें महाराष्ट्र देशा
तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा ।।२।।

वीर प्रतापी राय शिवाजी छत्रपती आमुचा
धर्म रक्षिण्या एकचि केला घोष स्वराज्याचा
भगवा झेंडा धन्य करी हें आनंदवनभुवन
स्वातंत्र्याच्या जरिपटक्याला लक्षवेळ नमन
पुण्याई पुरली शिवभूपाची पुढे
पेशवे पुण्याचे वळले अटकेकडे
साम्राज्य मराठी पसरे चोहीकडे
स्मरणें स्फुरतें हृदय वाकतें महाराष्ट्र देशा
तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा ।।३।।

भीमा वाही तिच्या सुरावर गाई जी गीत
तीच मराठी भाषा आमुची ठसली हृदयांत
ज्ञानेशांची ओवी, अभंग वाणी तुकयाची
श्लोक वामनी जिला भूषवी आर्या मयुराची

एकनाथ, चोखा, गोरा, ज्ञानेश्वर
रामदास, तुकया, नामा, मुक्तेश्वर
नच जात पाहतो भक्तांची ईश्वर
संतमंडळा लववूं माथा महाराष्ट्र देशा
तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा ।।४।।

मुक्ताबाई तशी जनाई आळविते देवा
सद्भावाला सहज लाभतो मोक्षाचा ठेवा
गतवीरांची पुण्य चरित्रें गाऊनि अंगाई
बाळा करिते महाराष्ट्राची जननी वा आई
शोभवी अहिल्या होळकराची पुरी
ती सती रमा भट वंशाला उद्धरी
स्वातंत्र्य लक्ष्मी प्रचंड संगर करी
प्रणिपात असो ह्या देवींना महाराष्ट्र देशा
तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा ।।५।।